मोटार वाहनांवरील प्रवेशकर विषयक
अभय योजना

[ॲम्नेस्टी स्कीम ].

महाराष्ट्र शासन,
शासन निर्णय क्रमांक-इएनटी-१५९३/सीआर-१२२/९३/करधान-१.
वित्त विभाग, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- १७ ऑगस्ट, १९९५

प्रस्ताविक:- महाराष्ट्र राज्य ट्रक, टेम्पो, टँकर्स, बस वाहतूक महासंघाने वाहतूक दारांच्या निरनिराळया मागण्यांवर तातडीने निर्णय घेण्याबाबत राज्य शासनाला सादर केलेल्या निवेदनामधील मागणी क्रमांक-४- जुन्या वाहनांवरच्या प्रवेश करावरील व्याज माफ करणे. ही मागणी शासनाच्या विचाराधीन होती. सदर मागणीचा काळजीपूर्वक विचार केल्यानंतर या संदर्भात सन १९९५-९६ च्या अतिरिक्त अर्थसंकल्पीय भाषणाच्या भाग-दुसरा मधील परिच्छेद-१०५ अन्वये शासनाने इतर राज्यांमधून महाराष्ट्र राज्यात वापरासाठी आयात केलेल्या मोटार वाहनांवरील प्रवेश करावरील व्याज सरसकटपणे माफ न करता, तद्संबंधी सवलतीचे व्याज लागू करण्याची प्रवेशकर अभय योजना [ॲम्नेस्टी स्कीम ] अंमलात आणण्याचा निर्णय घेतलेला आहे.

शासन निर्णय:-

१. महाराष्ट्र मोटार वाहन प्रवेशकर अधिनियम, १९८७ च्या कलम १४[२] अन्वये लागू होणा-या व्याजामध्ये सवलत देण्याच्या प्रयोजनासाठी राज्य शासन ही योजना [ॲम्नेस्टी स्कीम] जाहीर करीत आहे.

२. सदर योजना दिनांक १ सप्टेंबर १९९५ ते दिनांक ३१ डिसेंबर १९९५ पर्यन्तच्या चार महिने कालावधीसाठी लागू राहील.

3. या योजनेनुसार संबंधित मोटार वाहन आयातदारांकडून महाराष्ट्र मोटार वाहन प्रवेशकर अधिनियम, १९८७ च्या कलम १४ [२] अन्वये योजनेच्या पहिल्या दोन महिने कालावधीसाठी म्हणजे १ सप्टेंबर १९९५ ते दिनांक ३१ ऑक्टोबर १९९५ पर्यंत फक्त ५ टक्के व्याज रक्कम वसूल करुन तसेच योजनेच्या शेवटच्या दोन महिने कालावधीसाठी म्हणजे १ नोव्हेंबर १९९५ ते ३१ डिसेंबर १९९५ पर्यंत फक्त १० टक्के व्याज रक्कम वसूल करुन उर्वरित सर्व देय व्याज रक्कम माफ करण्यात येईल. तथापि, त्यासाठी आयातदाराने खाली नमूद केलेल्या अटींची पूर्तता करणे आवश्यक आहे:-

क्रु.मा.प.

[१] करपात्र ठरलेले संबंधीत मोटार वाहन दिनांक ३१ ऑगस्ट १९९५ रोजी अथवा तत्पूर्वीच्या कालावधीत इतर राज्यांमधून महाराष्ट्रात आणले असले पाहिजे.

[२] मोटार वाहन महाराष्ट्रात आणणा-या व्यक्ती वा संस्थेने स्वत:हून वाहनांवरील प्रवेश कराची आणि व्याजाची निर्धारणा करुन घेण्यासाठी पुढे आले पाहिजे.

[३] संबंधीत व्यक्ती अथवा संस्थेनी इतर राज्यांतून महाराष्ट्रात आणलेल्या मोटार वाहनांच्या बाबतीत वाहन ज्या तारखेस महाराष्ट्रात आणले त्या तारखेस लागू असलेल्या दराने मूळ कर आणि प्रवेश कर कायद्याच्या कलम १४[२] अन्वये योजनेच्या पहिल्या दोन महिने कालावधीसाठी म्हणजे १ सप्टेंबर १९९५ ते दिनांक ३१ ऑक्टोबर १९९५ पर्यंत फक्त ५ टक्के व्याज रक्कम आगाउ भरणा केली असली पाहिजे. तसेच योजनेच्या शेवटच्या दोन महिने कालावधीसाठी म्हणजे १ नोव्हेंबर १९९५ ते ३१ डिसेंबर १९९५ पर्यंत फक्त १० टक्के व्याज रक्कम आगाऊ भरणा केली असली पाहिजे. [ॲडव्हान्स पेमेन्ट].

[४] या सवलत योजनेचा लाभ घेणा-या व्यक्ती अथवा संस्थेला प्रवेशकर कायद्याखाली देय होणारी इतर कोणतीही शास्ती आकारण्यात येणार नाही.

[५] ज्या व्यक्ती वा संस्थेने इतर राज्यांमधून महाराष्ट्र राज्यात मोटार वाहन आणून वाहतूक अधिका-यांकडून त्यांची नोंदणी करुन घेतली असेल, तथापि, सदर नोंदीत मोटार वाहनावरील प्रवेशकराचा भरणा अद्यापपर्यंत केलेला नसेल अशा व्यक्ती आणि संस्थांना सुध्दा ही योजना लागू राहील.

[६] ज्या प्रकरणांमध्ये मोटार वाहनाच्या मूळ मालकांनी; त्यांच्या वाहनांच्या मालकी पत्राची [ॲलोटमेन्ट लेटर ] विक्री, इतर गि-हाईकांना केली आहे अशा प्रकरणी सुध्दा मोटार वाहनाचे मूळ मालक, तसेच तदनंतरचे मालक यांनी या योजनेतील अटीनुसार मूळ कराची तसेच मोटार वाहन प्रवेशकर कायद्याच्या कलम १४[२] अन्वये योजनेच्या पहिल्या दोन महिने कालावधीसाठी म्हणजे १ सप्टेंबर १९९५ ते दिनांक ३१ ऑक्टोबर १९९५ पर्यंत फक्त ५ टक्के व्याज रक्कम आगाऊ भरणा केली असेल, तसेच योजनेच्या शेवटच्या दोन महिने कालावधीसाठी म्हणजे १ नोव्हेंबर १९९५ ते ३१ डिसेंबर १९९५ पर्यन्त फक्त १० टक्के व्याज रक्कम आगाऊ भरणा केली असेल [ॲडव्हान्स पेमेन्ट] तर अशा मोटार वाहन मालकांना सुध्दा या या योजनेचा लाभ देण्यात येईल.

...3

[७] ज्या प्रकरणामध्ये मोटार वाहनांच्या मालकांनी कर निर्धारणे विरुध्द अपिले दाखल केली आहेत आणि अशी अपिले निर्णयासाठी प्रलंबित आहेत, अशा अपिलकर्त्यांनी खालील अटींची पूर्तता केल्यास त्यांना सुध्दा ही योजना लागू राहील

[अ] दाखल केलेले अपिल कोणतीही अट न घालता मागे घेतले पाहिजे.

[ब] ज्या तारखेस मोटार वाहनांची आयात केली, त्या तारखेस देय असलेला मूळ प्रवेश कर आणि कायद्याच्या कलम १४[२] अन्वये योजनेच्या पहिल्या दोन महिने कालावधीसाठी म्हणजे १ सप्टेंबर १९९५ ते दिनांक ३१ ऑक्टोबर १९९५ पर्यन्त फक्त ५ टक्के व्याज रक्कम तसेच योजनेच्या शेवटच्या दोन महिने कालावधीसाठी म्हणजे १ नोव्हेंबर १९९५ ते ३१ डिसेंबर १९९५ पर्यन्त फक्त १० टक्के व्याज रक्कम आगाऊ भरणा केली असली पाहिजे. [अॅडव्हान्स पेमेन्ट].

४. ही मोटारवाहन प्रवेशकर अभय योजना दिनांक १ सप्टेंबर १९८७ पासून ३१ ऑगस्ट १९९५ पर्यन्त महाराष्ट्र राज्यात आयात करण्यांत आलेल्या मोटार वाहनांच्या बाबतीतच मर्यादित राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ दि.श्री. दीक्षित ]
विशेष कार्य अधिकारी,
वित्त विभाग.

प्रत माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित.

१] महालेखापाल [लेखा परीक्षा] एक, महाराष्ट्र, मुंबई.
२] महालेखापाल [लेखा परीक्षा] दोन, महाराष्ट्र, नागपूर.
३] विक्रीकर आयुक्त, [एडीएम-११ शाखा], महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०० ०१० [२० प्रती].
४] संचालक लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५] परिवहन आयुक्त, मोटार वाहन विभाग, मित्तल चेंबर्स, नरीमन पॉइन्ट, मुंबई. [ ५ प्रती]
६] निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८] निवड नस्ती, करधान-१,
९] करधान-२, करधान-३, करधान-४.